**मे. शिवराज फाईन आर्ट व लिथो वर्क्स, नागपूर येथील कर्मचाऱ्यांना शासकीय सेवेत सामावून घेण्यासाठी शासकीय मुद्रणालय व ग्रंथागार, नागपूर यांच्या आस्थापनेवर सद्यस्थितीत कार्यरत कर्मचाऱ्यांकरिता अधिसंख्य पदे निर्माण करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक-शिमुना २०१३/प्र.क्र.४/१३/उद्योग-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ३१ जुलै, २०२३.

संदर्भ :- १) शासन राजपत्र, सन १९८४ च्या महाराष्ट्र अधिनियम क्र.३६, दिनांक २५.०४.१९८५.
२) शासकीय मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय, मुंबई यांचे दिनांक ०३.०५.१९९५ रोजीचे आदेश.
३) शासनाचे पत्र क्र.शिमुना-२०१३/प्र.क्र.४/१३/उद्योग-४, दिनांक ११.०१.२०१९
४) शासकीय मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय, मुंबई यांचे दिनांक ३०.०१.२०१९ रोजीचा प्रस्ताव.

**प्रस्तावना :-**

उद्योग विभागाच्या अधिपत्याखालील संचालक, शासन मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय, मुंबई यांच्या अधिनस्त असलेल्या मे. शिवराज फाईन आर्ट व लिथो वर्क्स, नागपूर येथील कर्मचाऱ्यांना शासकीय सेवेत सामावून घेणे व त्याकरीता शासकीय मुद्रणालय व ग्रंथागार, नागपूर यांच्या आस्थापनेवर सद्यस्थितीत कार्यरत कर्मचाऱ्यांना शासन सेवेत सामावून घेऊन त्यांच्याकरिता तेवढीच अधिसंख्य पदे निर्माण करण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्र.४ येथील नमुद पत्रान्वये शासनास सादर करण्यात आला. त्यानुषंगाने सदर मुद्रणालयात सद्यस्थितीत कार्यरत कर्मचाऱ्यांना शासन सेवेत सामावून घेऊन त्यांच्याकरिता शासकीय मुद्रणालय व ग्रंथागार, नागपूर येथील आस्थापनेवर तेवढीच अधिसंख्य पदे निर्माण करणेबाबत मा. मंत्री मंडळाने दिनांक ०४/०७/२०२३ च्या मंत्रीमंडळ बैठकीमध्ये मान्यता दिलेली आहे. त्यानुषंगाने मे.शिवराज फाईन आर्ट लिथो वर्क्स, नागपूर येथील कार्यरत कर्मचाऱ्यांना शासन सेवेत सामावून घेऊन, शासकीय मुद्रणालय व ग्रंथागार, नागपूर यांच्या आस्थापनेवर तेवढीच अधिसंख्य पदे निर्माण करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मे.शिवराज फाईन आर्ट व लिथो वर्क्स, नागपूर या मुद्रणालयातील सदर शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकास कार्यरत असलेल्या कर्मचाऱ्यांना या शासन निर्णयाद्वारे शासन सेवेत सामावून घेण्यास तसेच तेवढ्या पदसंख्येच्या मर्यादेत शासकीय मुद्रणालय व ग्रंथागार, नागपूर यांच्या आस्थापनेवर अधिसंख्य पदे निर्माण करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णयाच्या दिनांकापासून मे.शिवराज फाईन आर्ट व लिथो वर्क्स, नागपूर येथील मुद्रणालयातील कर्मचाऱ्यांना शासन सेवेत सामावून घेऊन, त्यांच्याकरिता तेवढीच अधिसंख्य पदे निर्माण केल्यामुळे त्यांना यापूर्वीचे कोणतेही शासन सेवेतील लाभ अथवा वेतन थकबाकी पुर्वलक्षी प्रभावाने दिले

जाणार नाहीत. सदर कर्मचाऱ्यांची सेवाज्येष्ठता स्वतंत्रपणे मे.शिवराज फाईन आर्ट व लिथो वर्क्स, नागपूर यांच्यापुरतीच मर्यादित राहील.

३. तसेच मे.शिवराज फाईन आर्ट व लिथो वर्क्स, नागपूर येथील कर्मचाऱ्यांना उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील नमुद दिनांक २५.०४.१९८५ रोजीच्या अधिनियमातील प्रकरण पाच, कलम १२ (१) (अ) आणि (ब) नुसार तसेच उपरोक्त संदर्भ क्र.२ येथील नमुद शासकीय मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय, मुंबई यांच्या दिनांक ०३.०५.१९९५ रोजीच्या आदेशान्वये सदर कर्मचाऱ्यांना ६० वर्षापर्यंत सेवा अनुज्ञेय आहे. त्यामध्ये जे कर्मचारी ५८ वर्षावरील आहेत, त्यांच्याकडून संमतीपत्र घेऊन, त्यांना सेवानिवृत्तीचा विकल्प देण्याची मुभा राहील.

४. सदर कर्मचाऱ्यांच्या सेवा विषयक बाबींच्या अनुषंगाने आवश्यक असलेल्या बाबींची पडताळणी संचालक, शासन मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय, मुंबई यांच्या स्तरावरुन करण्यात यावी. तसेच त्यांच्या सेवा विषयक बाबींसंदर्भात सामान्य प्रशासन विभाग व वित्त विभागाच्या सहमतीने पुढील आवश्यक ती कार्यवाही करण्यात येईल.

सदर शासन निर्णय मा.मंत्रिमंडळाच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर www.maharashtra.gov.in येथे उपलब्ध असून, त्यांचा संगणक सांकेतांक २०२३०७३११८५९०३३२१० आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SHASHANK TUKARAM CHAVAN

Digitally signed by SHASHANK TUKARAM CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=7dd1791f8c7f2d8cbabbae6c3c11ac3d4fe93ccab49daf36ff24dacd585e2276,
pseudonym=ECC424589A881E3E8CAB5C4F3152EABAEE38E22E,
serialNumber=A089DF063F1FFA9C6E2D052DB3C26C5B1ECE40048A4A7D39615BEE66D9E2053D, cn=SHASHANK TUKARAM CHAVAN
Date: 2023.07.31 19:01:01 +05'30'

**( शशांक चव्हाण )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मा. मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
२) मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मा. उपमुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
३) मा. मंत्री (सामान्य प्रशासन विभाग/वित्त /उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा.अध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
५) मा.सभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
६) मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
७) मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
८) मा.विधीमंडळ सदस्य (सर्व).
९) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
१०) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

१३) महालेखाकार, लेखा व अधिदान कार्यालय, मुंबई / नागपूर.

१४) सर्व सहसचिव/उपसचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.

१५) संचालक, शासन मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय, मुंबई.

१६) व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय व ग्रंथागार, नागपूर.

१७) भारतीय जनता पक्ष, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.कुटीर क्र.१, योगक्षेमसमारे, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईंट, मुंबई-२०.

१८) भारतीय राष्ट्रीय काँग्रेस, महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस (इं.) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-२५.

१९) राष्ट्रवादी काँग्रेस पक्ष, ठाकरसी हाऊस, जे.एन.हेरेडिया मार्ग, बॅलार्ड इस्टेट, मुंबई-३८

२०) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-२८.

२१) बहुजन समाज पक्ष, प्रदेश सचिव, महराष्ट्र राज्य, बी.एस.जी.भवन, भूखंड क्र. ८३-ए, कलेक्टर कॉलनी चेंबूर, मुंबई-७४.

२२) भारतीय कम्युनिस्ट पक्ष, महाराष्ट्र समिती, ३१४, राजभवन, एस.व्ही.पटेल मार्ग, मुंबई-०४.

२३) भारतीय कम्युनिस्ट (मार्क्सवादी) पक्ष, महाराष्ट्र समिती, जनशक्ती सभागृह, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई-१३.

२४) महाराष्ट्र नवनिर्माण सेना, राजगड, मातोश्री टॉवर, शिवाजी पार्क, दादर, मुंबई-२८.

२५) निवडनस्ती.